केंद्र पुरस्कृत समग्र शिक्षा कार्यक्रमासाठी अनुसूचित जाती (SCP) उप योजनेचा सन २०२२-२३ मधील अवितरीत निधी वितरीत करणेबाबत (केंद्र हिस्सा व राज्य हिस्सा).

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः समग्र-२०२३/प्र.क्र.०१ (भाग-३/एस.डी-१)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: २३ जून, २०२३.

वाचा :-

१) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग शासन निर्णय, समक्रमांक दि. ३१.०३.२०२३
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि. १२.०४.२०२३
३) राज्य प्रकल्प संचालक (समग्र शिक्षा), महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांचे पत्र क्र. मप्राशिप/लेखा-२/2nd Inst./Ele,Sec, TE/Rec, Non Rec/(SAP, GEN, SC, ST) निधी मागणी/ २०२२-२३/१२१३, दि १७.०४.२०२३
४) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग शासन शुध्दीपत्रक, समक्रमांक दि. २६.०४.२०२३
५) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र. बीजीटी २०२३/प्र.क्र.१/ अर्थसंकल्प (विघयो), दि. २१.०६.२०२३.

प्रस्तावना:-

राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांनी त्यांच्या संदर्भाधीन क्रमांक ३ येथील पत्रान्वये समग्र शिक्षा योजनेच्या अंमलबजावणीसाठीच्या सन २०२२-२३ मधील अवितरीत केंद्र हिस्सा व राज्य हिस्सा निधी वितरीत करण्याबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे.

२. समग्र शिक्षा योजनेसाठी केंद्र व राज्य शासनाच्या हिस्स्याचे प्रमाण ( केंद्र:राज्य) (६०:४०) असे आहे. केंद्र शासनाने दि.३०.३.२०२३ रोजीच्या पत्रान्वये अनुसूचित जाती उपयोजनेकरीता (SCP) रू.२२९,५३,३९,०००/- इतका निधी मंजुर केला आहे. सदर निधीच्या प्रमाणात राज्य हिस्सा निधी रू. १५३,०२,२६,०००/- इतका येतो. वित्त विभागाच्या (अर्थोपाय) शाखेने केंद्र हिस्सा निधी राज्य शासनाच्या एकत्रित निधीत जमा झाल्याबाबत अभिप्राय दिले आहेत. विभागाच्या दि. ३१.०३.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये केंद्र हिस्सा रु.१४०,५१,९४,०००/- व राज्य हिस्सा रू. ६५,८९,३३,६६७/- इतका निधी वितरीत करण्यात आला होता. तथापि, केंद्र व राज्य हिस्साकरीता अर्थसंकल्पिय तरतूद अपूरी असल्याने कमी प्रमाणात निधी वितरीत करण्यात आला होता. केंद्र हिस्सा रू. ८९,०१,४५,०००/- व राज्य हिस्सा रू. ८७,१२,९२,३३३/- इतका निधी अवितरीत होता. सदर अवितरीत निधी सन २०२३-२४ या वर्षाच्या अर्थसंकल्पिय तरतूदीतून वितरीत करण्याचा प्रस्ताव सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागामार्फत वित्त विभागास सादर

करण्यात आला होता. सदर प्रस्तावास वित्त विभाग व सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाने दिलेल्या मान्यतेच्या अनूषंगाने केंद्र हिस्सा (२२०२ आय ७४६) या लेखाशिर्षाखाली रू.८९,०१,४५,०००/- इतका निधी व राज्य हिस्सा (२२०२ आय ७५५) या लेखाशिर्षाखाली रू.८७,१२,९२,३३३/- इतका निधी सन २०२३-२४ या वर्षाच्या अर्थसंकल्पिय तरतूदीमधून वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय:-</u>**

केंद्र शासनाने उपरोक्त प्रमाणे उपलब्ध करुन दिलेला निधी खालील विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांच्याकडे समग्र शिक्षा कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी या आदेशान्वये वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर विवरणपत्रातील स्तंभ क्र.४ येथील वितरीत करावयाची तरतूद स्तंभ क्र.२ येथील लेखाशिर्षाकरिता मंजूर असलेल्या अर्थसंकल्पिय तरतूदीतून खर्च करण्यात यावी.

| अ. क्र. | लेखाशिर्ष | सन २०२३-२४ या वर्षात अर्थसंकल्पिय तरतूद | वितरीत करावयाची तरतूद |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | समग्र शिक्षा अभियान (केंद्र हिस्सा ६० टक्के) "मागणी क्र. एन-३, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, (०१) प्राथमिक शिक्षण, ७८९, अनुसूचित जातीसाठी विशेष घटक योजना, (०१) अनुसूचित जाती उपयोजना, (०१)(०३) समग्र शिक्षा अभियान ( केंद्र हिस्सा ६० टक्के), ३१- सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)(२२०२ आय ७४६) | रु. २२६,९२,२१,००० | रू. ८९,०१,४५,००० |
| २ | समग्र शिक्षा अभियान (केंद्र हिस्सा ४० टक्के) "मागणी क्र. एन-३, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, (०१) प्राथमिक शिक्षण, ७८९, अनुसूचित जातीसाठी विशेष घटक योजना, (०१) अनुसूचित जाती उपयोजना, (०१)(०४) समग्र शिक्षा अभियान ( राज्य हिस्सा ४० टक्के), ३१- सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)(२२०२ आय ७५५), | रु. १६६,९८,७५,००० | रू. ८७,१२,९२,३३३ |
| | **एकूण** | **३९३,९०,९६,०००** | **१७६,१४,३७,३३३** |

**२.** वित्त विभागाचे शासन परिपत्रक दि. १२.०४.२०२३ मधील नमूद केलेल्या सर्व बाबींची पूर्तता होत आहे. सदर अनुदान सशर्त अनुदान असुन यापुर्वी वितरीत केलेल्या निधीचे उपयोगिता

प्रमाणपत्र सादर करण्यात आले आहे. या अनुदानाच्या अटी व शर्ती सदर शासन निर्णयात नमुद केल्या आहेत.

३. सदर शासन निर्णयान्वये वितरीत केलेला निधी केंद्र शासनाचे दि.३०.०३.२०२३ रोजीच्या आदेशामध्ये दिलेल्या निदेशानुसार व सन २०२२-२३ च्या वार्षिक कार्ययोजना व अंदाजपत्रक प्रकल्प मान्यता मंडळाने (PAB) मंजूर केलेल्या समग्र शिक्षा योजनेच्या चालू योजनांच्या आवर्ती/अनावर्ती बाबीसाठी खर्च करावा. आवर्ती व अनावर्ती बाबीचा सविस्तर तपशील सोबत **परिशिष्ट "अ"** येथे जोडला आहे.

४. खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात सदर निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी.

५. अनुसूचित जाती या लेखाशिर्षाखाली उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, लेखाशिर्षनिहाय /उप लेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्ट्ये इ.माहिती, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, समाजकल्याण, पुणे; सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग व शालेय शिक्षण विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत न चुकता पाठवावी.

६. अनुसूचित जाती विशेष घटक योजना क्षेत्रात, अनुसूचित जाती उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

७. अनुसूचित जाती विशेष घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदीतून अनुसूचित जाती उपयोजना क्षेत्रात पायाभूत सुविधा निर्माण करण्याबाबतच्या तसेच वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात आणि अनुसूचित जाती उपयोजना बाह्य क्षेत्रात फक्त वैयक्तीक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात.

८. सदर खर्च वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि. १२.०४.२०२३ चे परिपत्रकामधील सूचनांनुसार करण्यात यावा. सदर निधी आहरीत करुन वितरीत करण्यासाठी अवर सचिव / कक्ष अधिकारी (रोख/लेखा शाखा), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, यांना "आहरण व संवितरण अधिकारी" तर सह/उप सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय यांना "नियंत्रक अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. संबंधित आहरण व संवितरण अधिकारी यांनी निधी कोषागारातून आहरित करुन निधी समग्र शिक्षा यांच्या बँक खात्यात जमा करावा.

९. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे संदर्भाधिन दि.१२.०४.२०२३ चे परिपत्रक व अनौपचारिक संदर्भ क्र.५६०/२०२३, व्यय-१४, दि. २.०६.२०२३ व सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाचा शासन निर्णय दि. २१.०६.२०२३ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

**१०.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०६२३१८०६३४८७२१ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SANTOSH UMESHRAO GAIKWAD

Digitally signed by SANTOSH UMESHRAO GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=1d60828c41033ab1da6d64ef17879745d578b334c05c1e8151ef933f134060bc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BC8833F9E213A7E4DFB9D2B071C9202EA52A04054E53B0C1BBF9E50C90A2CF5C, cn=SANTOSH UMESHRAO GAIKWAD
Date: 2023.06.23 20:58:47 +05'30'

**( संतोष गायकवाड )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा.मंत्री (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव
३) प्रधान, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
४) प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
५) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
६) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
७) राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, चर्नीरोड, मुंबई
८) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२ मुंबई, नागपूर
९) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर
१०) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई - ६३
११) सर्व वरिष्ठ लेखा परीक्षक (शिक्षण विभाग)
१२) अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई
१३) सह सचिव/ उप सचिव (विद्यार्थी विकास/ प्रशासन), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१४) वित्त विभाग(व्यय-१४ / अर्थसंकल्प शाखा), मंत्रालय, मुंबई
१५) कक्ष अधिकारी, लेखा शाखा, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१६) कक्ष अधिकारी, अर्थसंकल्प शाखा, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१७) निवड नस्ती (एस.डी.१).

| शासन निर्णय क्रमांक : समग्र-२०२३/प्र.क्र.०१ भाग-३/एसडी १ दिनांक २३.०६.२०२३ रोजीचे सहपत्र (रक्कम- रुपये) | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| अ.क्र. | बाब | केंद्र शासन आदेश दिनांक | आवर्ती | | | अनावर्ती | | | एकूण | | |
| | | | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा | एकूण | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा | एकूण | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा | एकूण |
| १ | प्राथमिक शिक्षण (अ) | ३० मार्च,२०२३ | | | | | | | | | |
| | | दुसरा हप्ता | ७४०१२७७५१ | ६१३३९९६६६ | १३५३५२७४१७ | १६६४०५८४ | २८६०६६६७ | ४५२४७२५० | ७५६७६८३३५ | ६४२००६३३३ | १३९८७७४६६८ |
| | | रेज्यूव्हेनेशन | ० | ० | ० | ९१००९०२८ | १५६४५२६६७ | २४७४६१६९५ | ९१००९०२८ | १५६४५२६६७ | २४७४६१६९५ |
| | एकूण अ | | ७४०१२७७५१ | ६१३३९९६६६ | १३५३५२७४१७ | १०७६४९६१२ | १८५०५९३३३ | २९२७०८९४५ | ८४७७७७३६३ | ७९८४५९००० | १६४६२३६३६२ |
| २ | माध्यमिक शिक्षण (ब ) | ३० मार्च,२०२३ | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० |
| | | दुसरा हप्ता | १२५३२३३९ | २१५४४००० | ३४०७६३३९ | ११५६०७६५ | १९८७४००० | ३१४३४७६५ | २४०९३१०४ | ४१४१८००० | ६५५११९०४ |
| | | रेज्यूव्हेनेशन | ६८१३७५ | ११७१३३३ | १८५२७०८ | ३६१६६४१ | ६२१७३३३ | ९८३३९७५ | ४२९८०१७ | ७३८८६६७ | ११६८६६८३ |
| | एकूण ब | | १३२१३७१४ | २२७१५३३३ | ३५९२९०४७ | १५१७७४०७ | २६०९१३३३ | ४१२६८७४० | २८३९११२१ | ४८८०६६६७ | ७७१९७७८७ |
| ३ | शिक्षक शिक्षण (क) | ३० मार्च,२०२३ | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० |
| | | दुसरा हप्ता | १२८५३४४२ | २२०९६००० | ३४९४९४४२ | ११२३०७५ | १९३०६६७ | ३०५३७४१ | १३९७६५१७ | २४०२६६६७ | ३८००३१८३ |
| | | रेज्यूव्हेनेशन | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० |
| | एकूण क | | १२८५३४४२ | २२०९६००० | ३४९४९४४२ | ११२३०७५ | १९३०६६७ | ३०५३७४१ | १३९७६५१७ | २४०२६६६७ | ३८००३१८३ |
| | एकूण (अ+ब+क) | | ७६६१९४९०७ | ६५८२११००० | १४२४४०५९०७ | १२३९५००९३ | २१३०८१३३३ | ३३७०३१४२७ | ८९०१४५००० | ८७१२९२३३३ | १७६१४३७३३३ |